**महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (Maharashtra Railway Infrastructure Development Company-MRIDC) स्थापन करणेसाठी येणारा खर्च अर्थसंकल्पित करण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- आरएलवाय २०१६/प्र.क्र.११६/परि-५,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च २०१७

वाचा :- १) मा. मुख्यमंत्री व मा.रेल्वेमंत्री यांचे दरम्यान दि.८.१.२०१५ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

२) राज्य शासन आणि रेल्वे मंत्रालय यांचे दरम्यान दि. २६.६.२०१५ रोजी झालेला सामंजस्य करार.

३) मंत्रिमंडळ सचिव यांनी दि.२७.१२.२०१६ चे पत्रान्वये कळविलेला दि.१५.१२.२०१६ रोजीचा मंत्रिमंडळ निर्णय.

४) मा. मुख्यमंत्री व मा. रेल्वेमंत्री यांचे दरम्यान दि.२४.१२.२०१६ रोजी झालेला संयुक्त उपक्रम करार.

५) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक आरएलवाय-२०१५/प्र.क्र.१३/परि-५, दि. २४.१.२०१७.

**प्रस्तावना :-**

राज्यातील रेल्वे प्रकल्पांना गती मिळावी, रेल्वे प्रकल्पांचा विकास, अंमलबजावणी आणि व्यवहार्यता तपासणे, प्रकल्प क्षमतेत वाढ करणे, प्रकल्प विहीत कालावधीमध्ये पूर्ण व्हावेत तसेच भुसंपादन झाल्यानंतर प्रकल्पबाधितांना मदत व पुनर्वसन त्वरेने होणेसाठी राज्य शासन आणि रेल्वे मंत्रालय यांचे संयुक्त भागीदारीतून महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (Maharashtra Railway Infrastructure Development Company- MRIDC) स्थापन करणेसाठी मा.मुख्यमंत्री व मा.रेल्वेमंत्री यांचे दरम्यान दि.८.१.२०१५ रोजी झालेल्या बैठकीमध्ये तत्वत: मंजूरी दिली होती. त्यानुसार महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (Maharashtra Railway Infrastructure Development Company-MRIDC) हे विशेष उपयोजिता वाहन (SPV - Special Purpose Vehicle) स्थापन करणेसाठी राज्य शासन आणि रेल्वे मंत्रालय यांचे दरम्यान दि.२६.६.२०१५ रोजी सामंजस्य करार (Memorandum of Understanding) करणेत आला आहे. तसेच शासनाच्या आर्थिक सहभागातून अंमलात आणावयाचे विविध प्रकल्प विशेष उपयोजिता वाहनाकडे (Special Purpose Vehicle) हस्तांतरीत करण्यासही शासनाने तत्वत: मान्यता दिली आहे.

२. मा. मंत्रिमंडळाने दि.१५.१२.२०१६ रोजीच्या बैठकीमध्ये विषय क्र. १३ नुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत:-

१) महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (Maharashtra Railway Infrastructure Development Company- MRIDC) स्थापन करणेस मान्यता देण्यात यावी.

२) राज्य शासन आणि रेल्वे मंत्रालय यांचे दरम्यान संयुक्त उपक्रम करार करण्यास मान्यता देण्यात यावी.

३) महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनीचे नोंदणीकरीता भागधारक करारनामा, संघटनेचा लेख च्या प्रारुपास मान्यता देण्यात यावी.

४) महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनीचे प्रारंभिक अधिकृत भागभांडवलातील राज्य शासनाचा हिस्सा म्हणून रु.५०.०० कोटी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात यावी. आर्थिक वर्ष २०१७-१८ मध्ये त्या अनुषंगाने नियतव्यय उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात यावी.

३. मा. मंत्रिमंडळाच्या निर्णयानुसार, मा. मुख्यमंत्री व मा. रेल्वेमंत्री यांचे दरम्यान दि.२४.१२.२०१६ रोजी संयुक्त उपक्रम करार झाला आहे. तसेच महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (Maharashtra Railway Infrastructure Development Company- MRIDC) स्थापन करण्यास संदर्भाधीन दि.२४.१.२०१७ चे शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी दिली होती. राज्य शासन आणि रेल्वे मंत्रालय यांच्या संयुक्त भागीदारीमधून महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी हे विशेष उद्देश वाहन (SPV - Special Purpose Vehicle) स्थापन करणेसाठी येणा-या खर्चासाठी तरतूद करणेसाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनीचे प्रारंभिक अधिकृत भागभांडवलातील राज्य शासनाच्या हिश्श्यापोटी तरतुद करणेसाठी खालीलप्रमाणे नवीन लेखाशीर्ष उघडण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

| मराठी लेखाशीर्ष | इंग्रजी लेखाशीर्ष |
|---|---|
| मागणी क्रमांक बी-१० | Demand No. B-10 |
| ५००२, भारतीय रेल्वे यावरील भांडवली खर्च (व्यावसायिक मार्ग) | 5002, Capital Outlay on Indian Railways- Commercial Line |
| १४-शासनाच्या व्यावसायिक उपक्रमांकरिता गुंतवणूक | 14-Investment in Government Commercial Undertakings |
| १९०-शासनाच्या व्यावसायिक उपक्रमांकरिता गुंतवणूक- इतर सार्वजनिक क्षेत्र | 190-Investment in Government Commercial Undertaking-Other Public Sector |
| (०१)(०१)- महाराष्ट्र लोहमार्ग पायाभूत विकास कंपनी (५००२००१४) | (01(01) Maharashtra Railway Infrastructure development Company (50020014) |
| ३२, अंशदाने | 32, Contribution |

२. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३२८/१४६१, दिनांक १६.१.२०१७ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६९/अर्थ-११, दिनांक ७.३.२०१७ तसेच महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई यांचे क्र. ख.वि./चा-१/गृह विभाग/यूओआर-१४९/२०१६-१७/१८६०, दिनांक २७.०२.२०१७ च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३१४१५०५५१२५२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df7492703428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2017.03.14 15:23:58 +05'30'

**( द.ह. कदम )**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग.**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
२) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
3) Executive Director (JV), Railway Boards, Ministry of Railways, Rail Bhavan, New Delhi-110 001
४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-८/ अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२,
७) अवर सचिव, नियोजन विभाग, का-१४६१, मंत्रालय, मुंबई-३२,
८) अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
९) निवड नस्ती/परि-५.